सन २००७ मधील अतिवृष्टी / पुरामुळे बाधित मौजे रामतिर्थ व खल्लार ता. दर्यापूर जि. अमरावती या गावठाणातील पूर पुनर्वसित भागासाठी प्रशासकीय मान्यता प्राप्त अंतर्गत खडीचे रस्ते बांधकाम करणे या नागरी सुविधा कामांना निधी प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एफएलडी-२०१८/२९४/प्र.क्र.११५/र-१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२३

वाचा -

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आरपीए-२००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आरपीए-०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८.३.२०११
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आव्यप्र-२१००/प्र.क्र.९७/आव्यप्र-२, दि.२.९.२०१४
४) वित्त विभाग शासन निर्णय क्र : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७.०४.२०१५
५) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र: विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दि.१६.१२.२०१५
६) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९.०१.२०१६
७) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. एफएलडी-२०१८/२९४/प्र.क्र.११५/र-१२, दि.२८.५.२०१९
८) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. एफएलडी-२०१८/२९४/प्र.क्र.११५/र-१२, दि.३१.३.२०२१
९) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. एफएलडी-२०१८/२९४/प्र.क्र.११५/र-१२, दि.०७.१२.२०२१
१०) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र.उपआ/पुनर्व/भूसं-१/म.स./कावि-१३३/२०२२, दि.११.०७.२०२२

शासन निर्णय -

सन २००७ मधील अतिवृष्टी / पुरामुळे बाधित झालेल्या ता. दर्यापुर जि. अमरावती मधील गावांचे पुनर्वसन व घरांची पुनर्बांधणी करण्यास दि.०२.०९.२०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानूसार २७ पुनर्वसित गावामध्ये अंतर्गत खडीचे रस्ते बांधकाम करणे या नागरी सुविधेच्या कामास दि.२५.०८.२०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली असून नागरी सुविधेच्या कामाच्या प्रगतीनूसार निधी वितरीत करण्यात येत आहे. त्यासार, शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र.२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, **मौजे रामतिर्थ व खल्लार ता. दर्यापूर जि. अमरावती** येथील पुनर्वसित भागात खालीलप्रमाणे नमूद **अंतर्गत खडीचे रस्ते बांधकाम करणे या** नागरी सुविधा कामांचे देयके अदा करण्यासाठी सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून **रु.२९,१६,०००/- (रुपये एकोणतीस लक्ष सोळा हजार फक्त ) एवढा निधी "मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ २२२९) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)"** या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, अमरावती यांच्यामार्फत संबंधित कार्यन्वयन यंत्रणेस उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र | पुनर्वसित गाव व नागरी सुविधा कामांचा तपशील | नागरी सुविधा कामांसाठी निधीचे वितरण |
|---|---|---|
| १ | रामतिर्थ येथील अंतर्गत खडीचे रस्ते बांधकाम करणे. | १५,००,००० |
| २ | खल्लार येथील अंतर्गत खडीचे रस्ते बांधकाम करणे. | १४,१६,००० |
| | | **एकूण रुपये २९,१६,०००** |

२. उपरोक्त प्रमाणे विभागीय आयुक्त, अमरावती यांच्यामार्फत संबंधित कार्यन्वयन यंत्रणेस निधी उपलब्धतेस खालील अटींच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

१) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित कार्यन्वयन यंत्रणेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त अमरावती व जिल्हाधिकारी अमरावती यांना सत्वर सादर करावा.

३) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

४) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

५) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत प्राप्त झालेला कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

६) संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त नमूद लेखा शीर्षांतर्गत होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखा शीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

७) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

८) संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilization Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावीत.

९) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२२-२०२३ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

३. वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी वरील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

४. सदर निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना BEAMS प्रणालीवर तातडीने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही महसूल व वन विभागाच्या म-११ कार्यासनाने करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१४१७३५४८९९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHULARAM R NIKHARE

Digitally signed by CHULARAM R NIKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E37123E923CF43F99F06B54384FF491E5F703F14D653B5A59D47EAB1F73E2597, cn=CHULARAM R NIKHARE
Date: 2023.03.14 17:40:41 +05'30'

**( चु. रा. निखारे )**
कार्यासन अधिकारी, महसुल व वन विभाग

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
२. जिल्हाधिकारी, अमरावती .
३. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१ /नागपूर-२ (२ प्रतीत)
४. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,/ नागपूर-२ (२ प्रतीत)
५. कार्यकारी अभियंता वि.प्र. (सा.बां.), विभाग क्र.२, दर्यापूर, अमरावती.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
७. वित्त विभाग, कार्यासन व्यय-९, अर्थसंकल्प-३/६, मंत्रालय, मुंबई-३२.
८. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी म-११/ब-१/पीएसी, मंत्रालय, मुंबई ३२.
९. निवडनस्ती कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**************